भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सन २०२४-२५ मध्ये राबविण्यासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करणेबाबत..... (२४०१ A८९८)

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. फुंफला-२०२४/प्र.क्र. १३८/९-अे,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २८ मार्च, २०२५

**संदर्भ:-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. राफयो-२०१८/प्र.क्र. ४७/९-अे, दि. ६.०७.२०१८
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. फुंफला-२०२३/प्र.क्र. १८७/९-अे, दि. २१.०९.२०२३
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. फुंफला-२०२४/प्र.क्र. ८३/९-अे, दि. १९.०६.२०२४
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र. ८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४
५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. फुंफला-२०२४/प्र.क्र. १३८/९-अे, दि. ११.१२.२०२४
६) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले पत्र जा.क्र. कृआ/फलो-२/भाफुंफलायो/नि.मा./२४-२५/१८८७/२०२५, दिनांक २९.०१.२०२५
७) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले पत्र जा.क्र. कृआ/फलो-२/भाफुंफलायो /नि.मा./३४७३/२०२५, दिनांक १४.०२.२०२५
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र. ८०/अर्थ-३, दि. १२.०२.२०२५
९) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२४/प्र.क्र.७/कार्यासन-६, दि. २७.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत जे शेतकरी फळबाग लागवडीकरिता पात्र ठरु शकत नाहीत अशा शेतकऱ्यांसाठी राज्य शासनाने उपरोक्त **संदर्भ क्र. १** येथील शासन निर्णयान्वये राज्यात भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सुरु केली आहे. सदर योजनेअंतर्गत **संदर्भ क्र. २** येथील शासन निर्णयान्वये सुधारित मापदंडांना मंजूरी देण्यात आली आहे. तसेच उक्त योजनेची सन २०२४-२०२५ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेल्या एकूण रु.१०४५०.०० लाख (रुपये एकशे चार कोटी पन्नास लाख फक्त) इतक्या निधीच्या कार्यक्रमास **संदर्भ क्र.३** येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. **संदर्भ क्र. ५** येथील शासन निर्णयान्वये योजनेंतगत अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रु. ३०.०० लाख यापूर्वी वितरीत करण्यात आला होता. तद्नंतर संचालक (फलोत्पादन) यांनी संदर्भ **क्र. ६ व ७** येथील पत्रांन्वये पुढील निधी वितरणाकरीता प्रस्ताव सादर केले आहेत. त्यास अनुलक्षून आदिवासी विकास विभागाने अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रु. ५.०० लाख एवढा निधी **संदर्भ क्र. ९** येथील शासन निर्णयान्वये कृषि विभागाकडे वर्ग केला आहे. सदर निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुलक्षून शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१) राज्यात भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड या योजनेची सन २०२४-२५ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रु. ५.०० लाख (रुपये पाच लाख फक्त) एवढा निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२) उक्त निधीतून सुरुवातीला सन २०२३-२४ मधील दायित्व अदा करण्यात यावे. तद्नंतर उर्वरित निधी सन २०२४-२५ मधील अनुदानासाठी खर्च करण्यात यावा.

३) सदर निधी खालील लेखाशीर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र. टी-५

२४०१- पिक संवर्धन

(००)(७९६) अनुसूचित जनजाती क्षेत्र उपयोजना,

(०१)(३७) भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना

३३, अर्थसहाय्य (२४०१ A८९८)

४) या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या निधीचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५) सदर योजना राबविताना यापूर्वी निर्गमित शासन निर्णयातील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) सदर उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदींतून फक्त अनुसूचित जमाती घटकातील लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

७) यापुढे निधी वितरणाचे प्रस्ताव सादर करण्यापूर्वी या योजनेमधील लाभार्थ्यांची माहिती MPSIMS वर अद्ययावत करण्याची दक्षता घ्यावी.

८) सदर वितरीत निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

९) उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, आदिवासी विकास विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

१०) निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

११) सदर आदेश वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२४/प्र.क्र. ८०/अर्थ-३, दि. १२ फेब्रुवारी, २०२५ मधील अटी व शर्तींचे अनुपालन करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

१२) सदर आदेश आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२४/प्र.क्र.७/कार्यासन-६, दि.२७.०३.२०२५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१३) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१२३८२५६४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VAISHALI MACHHINDRANATH TAMBE
Date: 2025.03.28 12:40:00 +05'30'

**( वैशाली तांबे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई-४०० ०३२.
५) सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) प्रधान सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१०) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
११) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१२) आयुक्त (आदिवासी विकास), महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१३) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१५) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१६) सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१८) संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई (२ प्रती)
१९) सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई -३२
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
२१) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२२) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई

२३) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२४) कक्ष अधिकारी, कार्यासन २ अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२५) कक्ष अधिकारी, व्यय-१४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
२६) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२७) निवड नस्ती/९-अे